**गट-क मधील लिपिक-टंकलेखक पदावर कायमस्वरुपी संवर्गबदलीने नियुक्तीसाठी अर्हता प्राप्त करणाऱ्या मंत्रालयीन विभागातील वाहन चालक संवर्गामधील कर्मचाऱ्यांची दिनांक २१.०२.२०१८ रोजीची अंतिम (Final) ज्येष्ठतेनुसार यादी.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः साजेसू-३८१८/प्र.क्र.१८२/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**तारीखः १८ फेब्रुवारी, २०१९**

वाचा:- शासन परिपत्रक क्रमांक:साजेसू-३८१८/प्र.क्र.१८२/१४-अ, दिनांक १५ जानेवारी, २०१९.

**शासन परिपत्रक**

मंत्रालयीन विभागातील वाहन चालक संवर्गातील कर्मचाऱ्यांपैकी, गट-क मधील लिपिक-टंकलेखक पदावर कायमस्वरुपी संवर्गबदलीने नियुक्ती करीता अर्हता प्राप्त व अर्ज केलेल्या कर्मचाऱ्यांची दिनांक २१.०२.२०१८ रोजीची तात्पुरती (provisional) ज्येष्ठतेनुसार यादी संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली होती. या संदर्भात विभाग / कर्मचाऱ्यांकडून प्राप्त आक्षेप, त्रुटी / वास्तविक चुका, विभागांचे त्यावरील अभिप्राय व विभागांकडून प्राप्त माहिती विचारात घेऊन प्रस्तुत सामाईक ज्येष्ठतेनुसार यादी अंतिम (Final) करण्यात येत आहे.

२. सदर जेष्ठतेनुसार यादीमध्ये लिपिक-टंकलेखक पदावर कायमस्वरुपी संवर्गबदलीने नियुक्ती करीता अर्हता प्राप्त व अर्ज केलेल्या, दि.२१ फेब्रुवारी, २०१८ रोजी वाहन चालक या संवर्गात किमान ३ वर्षाची नियमित सेवा पुर्ण केलेल्या, पदवी अथवा तत्सम परिक्षा उत्तीर्ण झालेल्या व टंकलेखनाचे आवश्यक गती (प्रती मिनीट ४० शब्द इंग्रजी किंवा ३० शब्द मराठी) असल्याचे नियमानुसार विहित केलेले प्रमाणपत्र (शासकीय वाणीज्य प्रमाणपत्र (गव्हर्नमेंट कमर्शियल सर्टिफिकेट)) किंवा संगणक टंकलेखन प्रमाणपत्र धारण केलेल्या मंत्रालयीन विभागातील वाहन चालक संवर्गामधील कर्मचाऱ्यांचा समावेश करण्यात आलेला आहे. सदर ज्येष्ठतेनुसार यादी या परिपत्रकासोबत परिशिष्ट 'अ' येथे जोडण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.बिंदुना-१०१८/प्र.क्र.५४/१४-अ, दि.०५.१२.२०१८, सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/१२, दि.२१.१०.२०११ तसेच सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १२ यांनी नस्ती क्र.बिंदुना-१०१८/प्र.क्र.५४/१४-अ वर अनौपचारिक संदर्भ क्र.१२८२/१८, दिनांक ३१-१०-२०१८ अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार सदर ज्येष्ठतेनुसार यादी तयार करण्यात आलेली आहे.

३. सदर ज्येष्ठतेनुसार यादी तयार करताना मुख्यत्वेकरुन महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ मधील तरतूदींचा अवलंब करण्यात आला आहे.

४. सर्व मंत्रालयीन विभागांनी उक्त ज्येष्ठतेनुसार यादीची प्रत वेबसाईटवरुन प्राप्त करुन घ्यावी तसेच अंतिम (Final) ज्येष्ठतेनुसार यादीत नाव समाविष्ट असलेल्या आपल्या विभागातील वाहन चालक संवर्गातील कर्मचाऱ्यांना ज्येष्ठतेनुसार यादीची प्रत वेबसाईटवरुन उपलब्ध करुन घेण्याबाबत कळवावे.

५. सदर शासन परिपत्रक व ज्येष्ठतेनुसार यादी महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९०२१८१५५५३०५३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.02.18 15:58:22 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

सहपत्र :- परिशिष्ट 'अ'

**प्रत,**

सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना).
निवड नस्ती/कार्यासन-१४ अ, संग्रहार्थ

**शासन परिपत्रक क्रमांक साजेसू-3818/प्र.क्र.182/14-अ, दिनाक 18 फेब्रुवारी, 2019 चे सहपत्र (परिशिष्ट "अ")**

मंत्रालयीन विभागातील लिपिक-टंकलेखक पदावर कायमस्वरुपी संवर्गबदलीने नियुक्तीसाठी अर्हता धारण करीत असलेल्या व अर्ज केलेल्या मंत्रालयीन विभागातील वाहन चालक संवर्गातील कर्मचाऱ्यांची दिनांक २१.०२.२०१८ रोजीची अंतिम (Final) जेष्ठतेनुसार यादी

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक | श्री / श्रीमती | वाहनचालक संवर्गामधील कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | विभागाचे नाव | कर्मचाऱ्याचा जात प्रवर्ग | जन्म दिनांक | वाहनचालक संवर्गामधील नियुक्तीचा दिनांक | नियुक्ती प्रवर्ग | पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | मराठी ३० श.प्र.मि./इंग्रजी ४० श.प्र.मि. टंकलेखनाची शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र / संगणक टंकलेखन प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण झाल्याचा दिनांक | एमएससीआयटी संगणक परीक्षा उत्तीर्ण केल्याचा दिनांक | लिपिक-टंकलेखक पदावर कायमस्वरुपी संवर्गबदलीने नियुक्तीसाठी जेष्ठता दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| १ | १ | श्री | सं.ना.दळवी | वाहन चालक | उऊवकावि | खुला | १९-०३-१९७१ | १३-०५-१९९६ | खुला | ०१-०१-२०१० | ०८-१०-२०१२ | नाही | ०१-०१-२०१० | |
| २ | २ | श्री | अ.रा.पाटील | वाहन चालक | गृह | खुला | ०१-०६-१९८४ | २९-०६-२००९ | खुला | ३१-१२-२०११ | ३०-०८-२०१६ | नाही | २८-०६-२०१२ | |